**ॲड.श्री. रणजीत वि. सांगळे, विशेष सरकारी अभियोक्ता**
**<u>यांना व्यावसायिक फी मंजूर करण्या बाबत....</u>**
**येलोगेट पोलीस ठाणे, मुंबई येथील गु.र.क्र.२०/२०२४ या गुन्हयातून उद्भवणाऱ्या न्यायालयीन प्रकरणामधील कामकाजाकरीता.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०४२४/प्र.क्र.८४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २३ एप्रिल, २०२५.

**<u>संदर्भ:-</u>**१.पोलीस सह आयुक्त (का.व सु.) यांचे पत्र क्र.सहआ./का.वसु./वा./६९६/२०२४, दि.०२.०५.२०२४.
२. शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग क्र.एसपीपी-२०२४/यू.ओ.आर.६७/डी-१४, दि.०३.०६.२०२४.

**शासन निर्णय :-**

येलोगेट पोलीस ठाणे, मुंबई येथील गु.र.क्र.२०/२०२४ या दाखल गुन्ह्यातून उद्भवणाऱ्या न्याय प्रकरणी मा.सत्र न्यायालय मुंबई या न्यायालयातील न्यायालयीन कामकाज शासनाच्या वतीने पाहण्यासाठी “विशेष सरकारी अभियोक्ता” म्हणून ॲड.रणजीत वि. सांगळे यांची संदर्भाधीन क्र.२ येथील शासन अधिसूचनेन्वये नियुक्ती करण्यात आलेली आहे. ॲड.सांगळे यांना खालीलप्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**मा.सत्र न्यायालय, मुंबई येथील कामकाजाकरीता**

अ) प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी - रू. ५०,०००/- (अक्षरी रुपये पन्नास हजार फक्त)

उपरोक्त नमूद फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ ॲड. सांगळे यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता फी चे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा.न्यायालयाच्या प्रबंधकाकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त/ पोलीस अधीक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या “मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) १०८, राज्य मुख्यालय पोलीस (०२) (०१) शहर पोलीस आस्थापना - (२०५५ ००९७) - २८-व्यावसायिक सेवा” या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२५०४२३१४५३१५६१२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HARESHWAR NAMDEO SAHANE

Digitally signed by HARESHWAR NAMDEO SAHANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=c666d6034b5e98c5d1bd37af6d50b3277469ad6a9c55fe42051469194c47c2d0, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A0C4666E299E972427F9DABEDD7FF52FB5313B50C0D9A59C64EC908916651EC1, cn=HARESHWAR NAMDEO SAHANE
Date: 2025.04.23 14:54:40 +05'30'

**(हरेश्वर सहाणे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२) पोलीस सह आयुक्त, (का.व सु.) मुंबई.
३) अपर पोलीस आयुक्त (दक्षिण प्रादेशिक विभाग) मुंबई
४) पोलीस उप आयुक्त, बंदर परिमंडळ, मुंबई.
५) वरिष्ठ पोलीस निरीक्षक, येलोगेट पोलीस ठाणे, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई-१, महाराष्ट्र राज्य.
७) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९) ॲड.रणजीत वि. सांगळे, The Arcade, T-४/४, वर्ल्ड ट्रेड सेंटर, कफ परेड, मुंबई-५.
१०) कार्यासन अधिकारी (१४-का), विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती (पोल-१०).